श्रीवीर संवत २४३९, शके १८३५ चैत्र शुद्ध ८ दिवशी जि० पुणे, मु० पनदरे येथे नवीन मंदिर बांधून श्रीजिन पंचकल्याणिक प्रतिष्ठोत्सव केला त्या वेळीं या पुस्तकाच्या ५०० प्रति जैनधर्मी बांधवास अर्पण केल्या.

मेता दाजी दलुचंद सोलापुरकर.

दोसी गुलाबचंद हीराचंद पनदरेकर.

श्रीमत्समंतभद्राचार्यकृत

रत्नकरंड.

# उपासकाध्ययन.

[ श्रावकाचार ]

---

ह्याचें मराठी भाषांतर

**नाना रामचंद्र नाग यांनीं**

मुंबई:—निर्णयसागर छापखान्यांत

छापून प्रसिद्ध केलें.

वीर संवत् २४३० शके १८२६

किंमत चार आणे.

# प्रस्तावना.

जैन दिगंबर धर्मांतील श्रावक लोकांचें आचरण ज्या धर्मपुस्तकाच्या आधारानें चालतें त्याला उपासकाध्ययन किंवा श्रावकाचार ह्मणतात. उपासक ह्मणजे जिनभक्त यानें जें अध्ययन ह्मणजे शिकावयाचें तें उपासकाध्ययन होय. द्वादशांग जिनवाणीमध्यें उपासकाध्ययन हें सातवें अंग आहे.

जैनदिगंबर आम्नायांत [धर्मांत] श्रावकाचाराचीं कित्येक पुस्तकें जीं हल्लीं पाहण्यांत येतात तीं अशीं

| पुस्तकाचें नांव. | कर्त्याचें नांव. | विक्रमसाल. |
|---|---|---|
| १ रत्नकरंडश्रावकाचार– | समंतभद्राचार्य– | १२५ |
| २ वसुनंदिश्रावकाचार– | वसुनंद्याचार्य– | ६२६ |
| ३ चारित्रसार– | चामुंडराजा– | ७९५ |
| ४ पुरुषार्थसिद्ध्युपाय– | अमृतचंद्राचार्य– | ९६२ |
| ५ अमितगतिश्रावकाचार– | अमितगतिमुनि– | १०५० |
| ६ सागारधर्मामृत– | आशाधरपंडित– | १२९२ |
| ७ प्रश्नोत्तरश्रावकाचार– | सकलकीर्तिमुनि– | १४९५ |

ह्या सर्वांत अत्यंत प्राचीन आणि सर्वमान्य पुस्तक म्हटलें म्हणजे समंतभद्राचार्यकृत रत्नकरंडश्रावकाचार होय. कारण ह्यांच्या पूर्वी झालेल्या कोणीं आचार्यांनीं केलेलें श्रावकाचाराचें पुस्तक कोठें पाहण्यांत येत नाहीं. तेव्हां सर्व श्रावक लोकांस आपलें आचरण कसें असावें हें समजून घेण्यास मूल आधारभूत पुस्तक म्हटलें म्हणजे हेंच होय असें म्हणण्यास हरकत नाहीं. असें समजून ह्या पुस्तकाचें मराठी भाषेंत होईल तितक्या सोप्या शब्दांनीं भाषांतर करून प्रसिद्ध केलें आहे.

ह्या पुस्तकाच्या प्रती कर्नाटकांत वगैरे आहेत त्यांत कांहीं उक्तंच, म्हणून श्लोक घातलेले आहेत. ते श्लोक समंतभद्र आचार्यांचे रचलेले नसून दुसऱ्या आचार्यांचे असल्यामुळें ते आम्हीं ह्या पुस्तकांत घेतले नाहींत.

# अनुक्रमणिका.

ॐ नमः सिद्धेभ्यः ।

# रत्नकरंड श्रावकाचार.

## मंगलाचरण.

नमः श्रीवर्धमानाय

निर्धूतकलिलात्मने ॥

सालोकानां त्रिलोकानां

यद्विद्या दर्पणायते ॥ १ ॥

अर्थ–ज्यांच्या ज्ञानामध्यें आलोकास[1]हित तीन लोक दर्पणाप्रमाणें प्रतिबिंबित होतात व ज्यांच्या आत्म्याचा [कर्मरूपी[2]] मल धुतला आहे अशा श्री (लक्ष्मीयुक्त[3]) वर्धमानस्वामीला नमस्कार असो.

(ग्रंथप्रारंभ) धर्मोपदेश सांगण्याची प्रतिज्ञा.

देशयामि समीचीनं

धर्मं कर्मनिबर्हणं ॥

---

१ ज्या प्रदेशांत जीवादिक पांचही द्रव्यें मुळीच नाहींत

२ ज्ञानावरण दर्शनावरण मोहिनी, अंतराय

३ अनंतज्ञान दर्शन वीर्य, सुख समवसरण वैभवयुक्त.

संसारदुःखतः सत्वान्
यो धरत्युत्तमे सुखे ॥ २ ॥

अर्थ—संसारदुःखापासून 'सोडवून' उत्तम प्रकारचें सुख (मोक्ष) प्राप्त करून देतो अशा कर्मनाशक व सम्यक्(उत्कृष्ट) धर्माचा उपदेश करितों. [असें आचार्य समंतभद्रस्वामी ह्मणतात.]

धर्माचें लक्षण.

सद्दृष्टिज्ञानवृत्तानि
धर्मं धर्मेश्वरा विदुः ॥
यदीयप्रत्यनीकानि
भवंति भवपद्धतिः ॥ ३ ॥

अर्थ—धर्माचे ईश्वर (तीर्थंकर व गणधरादिक आचार्य यांनीं) सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान, आणि सम्यक्चारित्र यांस धर्म ह्मटलें आहे. या तिहींच्या उलट (मिथ्यादर्शन, मिथ्याज्ञान, मिथ्याचारित्र) हे संसारांतच जीवास गुंतविणारें आहेत.

सम्यग्दर्शनाचें लक्षण.

श्रद्धानं परमार्थाना-
मासागमतपोभृतां ॥
त्रिमूढापोढमष्टांगं
सम्यग्दर्शनमस्मयं ॥ ४ ॥

अर्थ—सत्यार्थ देव, शास्त्र आणि गुरु यांवर आठ अंगसहित आणि तीन मूढता व आठ गर्वरहित श्रद्धा (विश्वास) ठेवणें याला सम्यग्दर्शन ह्मणतात.

सत्यार्थ आप्ताचें (देवाचे) लक्षण.

आप्तेनोच्छिन्नदोषेण
सर्वज्ञेनागमेशिना ॥
भवितव्यं नियोगेन
नान्यथा ह्याप्तता भवेत् ॥ ५ ॥

अर्थ—निर्दोषपणा, सर्वज्ञपणा, आणि आगमेशित्व, हे तीन गुण ज्याला आहेत त्यालाच आप्तपणा असणें योग्य आहे. हे तीन गुण असल्यावांचून आप्तपणा येत नाहीं.

( १ ) निर्दोषपणाचें लक्षण.

क्षुत्पिपासाजरातंक-
जन्मांतकभयस्मयाः ॥
न रागद्वेषमोहाश्च
यस्याप्तः स प्रकीर्त्यते ॥ ६ ॥

अर्थ—ज्याला भूक, तहान, म्हातारपण, रोग, जन्म, मृत्यु, भय, गर्व, प्रीति, द्वेष मोह, [चिंता, रति, निद्रा, विस्मय, विषाद स्वेद, खेद.] हे अठरा दोष नाहींत त्या-लाच आप्त ( वीतरागदेव ) म्हणतात.

( २ ) सर्वज्ञपणाची पर्यायनावें व लक्षण.

परमेष्ठी परंज्योति-
र्विरागो विमलः कृती ॥
सर्वज्ञोनादिमध्यांतः
सार्वः शास्तोपलाल्यते ॥ ७ ॥

परमेष्ठी—उत्तम पदांत राहणारा.
परंज्योतिः—अत्यंत तेजःपुंज.
विरागः—ज्याची कशावरही प्रीति नाहीं.

विमलः—ज्याला कर्मरूपी मळ नाहीं.
कृतीः—सर्व सत्कृत्यें ज्यानें पूर्वींच केलीं.
सर्वज्ञः—सर्व जाणणारा.  [ अंत नाहींत.
अनादिमध्यांतः—ज्याला आदि मध्य व
सार्वः—सर्वांचें हित करणारा.
शास्ताः—सर्वांला हितोपदेश देणारा.

( ३ ) आगमेशित्व ( हितोपदेशीचें ) लक्षण.

अनात्मार्थं विनारागैः
शास्ता शास्ति सतो हितं ॥
ध्वनन् शिल्पिकरस्पर्शा-
न्मुरजः किमपेक्षते ॥ ८ ॥

अर्थ—शास्ता हितोपदेशी ( अरिहंत भगवान् ) स्वतःच्या प्रयोजनाशिवाय व अन्य जीवावर प्रीति नसूनही सत्पुरुषाच्या हिताचा उपदेश देतो. जसा—शिल्पिकाराचा हात पडल्याबरोबर मृदंग शब्द करतो त्या शब्द करण्यामध्यें मृदंगाची काय आशा असते ? कांहीं आशा नसते.

सत्यार्थशास्त्राचें लक्षण.

आप्तोपज्ञमनुल्लंघ्य-
मदृष्टेष्टविरोधकं ॥
तत्वोपदेशकृत सार्वं
शास्त्रं कापथघट्टनं ॥ ९ ॥

अर्थ—तें सर्वज्ञ आप्तानें सांगितलेलें, ज्यांतील वचनें मोडणें शक्य नाहीं. ज्यांत प्रत्यक्ष परोक्ष व हितकर अशाशीं उलट कांहीं नाहीं, ज्यामध्यें तत्वाचा उपदेश असेल, ज्यांत सर्वांचें हित वर्णन केलें असेल. आणि ज्यांत कुमार्गाचें (कुमताचें) खंडन केलेलें असेल, तेंच शास्त्र होय.

सत्यार्थगुरूचें लक्षण.

विषयाशावशातीतो
निरारंभोपरिग्रहः ॥
ज्ञानध्यानतपोरक्त-
स्तपस्वी स प्रशस्यते ॥ १० ॥

अर्थ—ज्याला विषयाची आशा नाहीं,

आरंभ आणि परिग्रहही ज्यानें सोडलीं आहेत, ज्ञान, ध्यान, आणि तप, ह्यामध्यें निमग्न असतो, त्याला तपस्वी [ह्मणजे गुरू असें ] ह्मटलें आहे.

[ आतां सम्यक्त्वाच्या आठ अंगांचें वर्णन करितात. ]

( १ ) निःशंकितअंगाचें लक्षण.

इदमेवेदृशमेव
तत्वं नान्यन्न चान्यथा ॥
इत्यकंपायसांभोव-
त्सन्मार्गे संशयारुचिः ॥ ११ ॥

अर्थ—तत्व हेंच आहे आणि असेंच आहे, दुसरें नाहीं किंवा दुसऱ्या प्रकारचें नाहीं. अशी न हालणाऱ्या [ तरवारीच्या ] पाण्यासारखी सन्मार्गावर (जैनमार्गांत) संशयरहित रुचि ठेवणें [ याला निःशंकित-अंग ह्मणतात. ]

( २ ) निःकांक्षितअंगाचें लक्षण.

कर्मपरवशे सांते
दुःखैरंतरितोदये ॥

पापबीजे सुखेनास्था

श्रद्धानाकांक्षणा स्मृता ॥ १२ ॥

अर्थ—सर्वस्वीं कर्माच्या स्वाधीन असणारें, शेवटीं नाश पावणारें, उदयकाळीं दुःख मिश्रित असणारें, आणि पाप उत्पन्न करणारें अशा सुखाची आस्थापूर्वक श्रद्धा न करणें हे निःकांक्षितअंग होय.

( ३ ) निर्विचिकित्सितअंगाचें लक्षण.

स्वभावतोऽशुचौ काये

रत्नत्रयपवित्रिते ॥

निर्जुगुप्सागुणप्रीति-

र्मता निर्विचिकित्सता ॥ १३ ॥

अर्थ—शरीर हें मूळचें अमंगळ आहे, परंतु ज्यांनीं तें रत्नत्रय धारण करून पवित्र केलें आहे त्यांच्या शरीराविषयीं ग्लानि नकरतां गुणावर प्रीति करणें, याला निर्विचिकित्साअंग ह्मणतात.

( ४ ) अमूढदृष्टिअंगाचें लक्षण.

कापथे पथि दुःखानां
कापथस्थेप्यसंमतिः ॥
असंपृक्तिरनुत्कीर्ति-
रमूढा दृष्टिरुच्यते ॥ १४ ॥

अर्थ–दुःखदायक अशा खोट्या मार्गा-विषयीं आणि खोट्या मार्गांत असणाऱ्या लोकांविषयीं [ मनानें ] संमति न देणें. [ कायेनें ] प्रशंसा न करणें, आणि [ वाचेनें] त्यांविषयीं बाहेर कीर्ति न करणें यास अमूढदृष्टिअंग ह्मणतात.

( ५ ) उपगूहनअंगाचें लक्षण.

स्वयंशुद्धस्य मार्गस्य
बालाशक्तजनाश्रयां ॥
वाच्यतां यत्प्रमार्जंति
तद्वदंत्युपगूहनं ॥ १५ ॥

अर्थ–स्वतः निर्दोष आहे अशा जैन-मार्गावर अज्ञानी, व अशक्त लोकांचें दो-

षारोप होत असतील तर ते आक्षेप दूर करणें त्यास उपगूहनअंग ह्मणतात.

( ६ ) स्थितीकरणअंगाचें लक्षण.

दर्शनाच्चरणाद्वापि
　　चलतां धर्मवत्सलैः ॥
प्रत्यवस्थापनं प्राज्ञैः
　　स्थितीकरणमुच्यते ॥ १६ ॥

अर्थ—सम्यग्दर्शनापासून किंवा सम्यक्चारित्रापासून चलायमान ( भ्रष्ट ) होत असलेल्या प्राण्यास, धर्मावर प्रेम ठेवणाऱ्या ज्ञानी लोकांनीं मदत करून त्यास पुनः सम्यग्दर्शनांत व चारित्रांत स्थिर करविणें यास ज्ञानी स्थितीकरणअंग ह्मणतात.

( ७ ) वात्सल्यअंगाचें लक्षण.

स्वयूथ्यान् प्रतिसद्भाव-
　　सनाथापेतकैतवा ॥
प्रतिपत्तिर्यथायोग्यं
　　वात्सल्यमभिलप्यते ॥ १७ ॥

अर्थ—आपल्या धर्मबंधूंचा खऱ्या भावानें कपट सोडून यथायोग्य सत्कार करणें यास वात्सल्यअंग ह्मणतात.

( ८ ) प्रभावनाअंगाचें लक्षण.

अज्ञानतिमिरव्याप्ति-
मपाकृत्य यथायथं ॥
जिनशासनमाहात्म्य-
प्रकाशः स्यात्प्रभावना ॥ १८ ॥

अर्थ—अज्ञानरूपी व्यापलेल्या अंधकाराचा नाश करून होईल तितकें जैनधर्माचें महत्व यथायोग्य प्रगट करणें हे प्रभावनाअंग होय.

अंगहीनाचें फल.

नांगहीनमलं छेत्तुं
दर्शनं जन्मसंततिं ॥
नहि मंत्रोक्षरन्यूनो
निहंति विषवेदना ॥ १९ ॥

अर्थ—जसें अपुरत्या अक्षरांच्या मंत्रानें

विषाच्या वेदना नाहींशा होत नाहींत, तसे अंगहीन सम्यग्दर्शन हें जन्ममरणरूपी संसाराचा फेरा तोडण्यास समर्थ नाहीं.

[ आतां तीन मूढतेचें वर्णन करितात. ]

( १ ) लोकमूढतेचें लक्षण.

आपगा सागरस्नान-
मुच्चयः सिकताश्मनां ॥
गिरिपातोऽग्निपातश्च
लोकमूढं निगद्यते ॥ २० ॥

अर्थ–[ धर्म समजून] नदी व समुद्रांत स्नान करणें. वाळूचे व दगडाचे ढीग करणें, डोंगरांवरून उडी टाकणें, अग्नींत उडी घालणें, ह्यास लोकमूढता ह्मणतात.

( २ ) देवमूढतेचें लक्षण.

वरोपलिप्सयाशावान्
रागद्वेषमलीमसाः ॥
देवता यदुपासीत
देवतामूढमुच्यते ॥ २१ ॥

अर्थ—जो आशावान् मनुष्य वरप्राप्ती-च्या लोभामुळें रागद्वेषानें मलीन असलेल्या देवतांची उपासना (नमस्कार पूजा) करितो यास देवतामूढ ह्मणतात.

( ३ ) गुरुमूढतेचें लक्षण.

सग्रंथारंभहिंसानां
संसारावर्तवर्तिनां ॥
पाखंडिनां पुरस्कारो
ज्ञेयं पाखंडि मोहनं ॥ २२ ॥

अर्थ—परिग्रह ठेवून आरंभहिंसा करणाऱ्या आणि संसाराच्या भ्रमणामध्यें भ्रमणाऱ्या, अशा पाखंडी लोकांचा सत्कार करणें यास पाखंडीमूढ ह्मणतात.

आठ मदांचीं नावें.

ज्ञानं पूजां कुलं जातिं
बलमृद्धिं तपो वपुः ॥
अष्टावाश्रित्य मानित्वं
स्मयमाहुर्गतस्मयाः ॥ २३ ॥

अर्थ—ज्ञान, सन्मान, कुल, जाति, बल, संपत्ति, तप, शरीर ह्या आठ पदार्थांच्या आश्रयानें अभिमान करणें याला मद र-हित गणधरादिक आचार्य्य गर्व ह्मणतात.

गर्वकरण्याचें फल.

स्मयेन योन्यानत्येति
धर्मस्थान् गर्विताशयः ॥
सोत्येति धर्ममात्मीयं
न धर्मो धार्मिकैर्विना ॥ २४ ॥

अर्थ—जो गर्विष्ठमनुष्य मदेंकरून दु-सऱ्या धार्मिक माणसांचा तिरस्कार करितो तो स्वतःच्या धर्माचा तिरस्कार करितो. कारण धार्मिकावांचून धर्म नाहीं.

सम्यग्दर्शनाचा महिमा.

सम्यग्दर्शनसंपन्न-
मपि मातंगदेहजं ॥
देवा देवं विदुर्भस्म-
गूढांगारान्तरौजसं ॥ २५ ॥

अर्थ—चांडाळाच्या पोटीं उत्पन्न झालेला जरी असला तथापि सम्यग्दर्शनयुक्त असेल तर तो देव आहे, असें गणधरादिक देव समजतात. यास दृष्टांत, जसा अग्नि राखेंत झांकलेला असला तरी तो तेजस्वी असतोच तसा.

दर्शनं ज्ञानचारित्रात्
साधिमानमुपाश्नुते ॥
दर्शनं कर्णधारं त-
न्मोक्षमार्गे प्रचक्षते ॥ २६ ॥

अर्थ—ज्ञान आणि चारित्र ह्या दोहींपेक्षां सम्यग्दर्शनच अधिक थोर उपासना मानली जाते. सम्यग्दर्शन हें मोक्षमार्गांत नावाड्यासारखें मानलें आहे.

सम्यग्दर्शनाची मुख्यता.

विद्यावृत्तस्य संभूति-
स्थितिवृद्धिफलोदयाः ॥
न संत्यसति सम्यक्त्वे
बीजाभावे तरोरिव ॥ २७ ॥

अर्थ—जसें बीज नसल्यास वृक्षाची उत्पत्ति, स्थिति, वृद्धि, आणि फल हीं होत नाहींत, तसेंच सम्यक्त्व नसल्यास ज्ञान, चारित्र ह्यांची उत्पत्ति, स्थिति, वृद्धि आणि फल हीं होत नाहींत.

गृहस्थो मोक्षमार्गस्थो
निर्मोहो नैव मोहवान् ॥
अनगारो गृही श्रेयान्
निर्मोहो मोहिनो मुनेः ॥ २८ ॥

अर्थ—दर्शन मोह ( मिथ्यात्व ) सोडलेला गृहस्थ देखील मोक्षमार्गांत राहतो. परंतु मोहवान् ( मिथ्यात्वी ) मुनी मोक्षमार्गांत रहात नाहीं. यावरून मोहवान् मुनीपेक्षां मोहरहित गृहस्थ श्रेष्ठ आहे.

हित अहित पदार्थ.

न सम्यक्त्वसमं किंचित्
त्रैकाल्ये त्रिजगत्यपि ॥
श्रेयोश्रेयश्च मिथ्यात्व-
समं नान्यत्तनूभृताम् ॥ २९ ॥

अर्थ–त्रैलोक्यांत तीन्हीं काळीं प्राणिमात्राला कल्याण करणारा सम्यक्त्वासारखा दुसरा पदार्थ नाहीं. आणि मिथ्यात्वासारखा अहित करणारा पदार्थ नाहीं.

अव्रतसम्यक्त्वाचें फलवर्णन.

सम्यग्दर्शनशुद्धा
नारकतिर्यङ्नपुंसकस्त्रीत्वानि ॥
दुष्कुलविकृताल्पायु-
र्दरिद्रतां च व्रजंति नाप्यव्रतिकाः ॥३०॥

अर्थ–ज्यांचें सम्यग्दर्शन शुद्ध[1] आहे ते व्रतरहित जरी असले तरी त्यांना[2] नरकगति. तिर्यंचगति, नपुंसकपणा, स्त्रीपणा, नीचकुलांतजन्महोणें, विकलअंग, अल्पआयुष्य, दारिद्र्य इत्यादि गोष्टी होत नाहींत.

देवेंद्रचक्रमहिमानममेयमानं
राजेंद्रचक्रमवनींद्रशिरोर्चनीयं ॥

१ आठ अंगसहित, तीन मूढता व आठ मदरहित,
२ सम्यक्त्वापूर्वी नरकगतीचा बंध झाला नाही,

धर्मेंद्रचक्रमधरीकृतसर्वलोकं
लब्ध्वा शिवं च जिनभक्तिरुपैति भव्यः ३१

अर्थ—जिनेंद्राची भक्ति करणारा भव्य-जीव इंद्रपदाचें अगण्य वैभव पावून, पृथ्वीपतीला वंद्य अशा राज्यविभूतीला भोगून, संपूर्ण लोकांत श्रेष्ठ असें धर्मचक्र (तीर्थंकर) पद पाऊन मोक्षाला जातो.

॥इति श्रीसमंतभद्रविरचिते रत्नकरंडनाम्नि उपासकाध्ययने सम्यग्दर्शनवर्णनो नाम प्रथमः परिच्छेदः ॥ १ ॥

अर्थ—याप्रमाणें समंतभद्रस्वामींनीं रचिलेल्या रत्नकरंड श्रावकाचारांतील सम्यग्दर्शनवर्णन नांवाचा पहिला भाग समाप्त झाला ॥ १ ॥

---

[ या ग्रंथांतील विशेष महत्वाचा हाच भाग (सम्यक्त्व) आहे. याचे ३१ श्लोक आहेत. प्रथम २ श्लोक उपोद्घातादाखल आहेत. तिसऱ्या श्लोकांत धर्माचें लक्षण

सांगून चौथ्यांत सम्यक्त्वाचें स्वरूप सांगितलें आहे. त्यांत मुख्य दोन गोष्टी आहेतः-श्रद्धा कोणावर ठेवावी, व ती कशाप्रकारें ठेवावी. पहिल्या प्रश्नाचें उत्तर पहिल्याच चरणांत देऊन त्याचें विवरण ५ ते १० या ६ श्लोकांत केलें आहे. दुसऱ्या प्रश्नाचें उत्तर दुसऱ्या चरणांत देऊन त्याचे पुनः तीन भाग केले ते(१) आठ अंग पालन करणें, (२) तीन मूढता सोडणें, (३) गर्व न करणें.

आठ अंगांचे वर्णन ११ ते १८ या आठ श्लोकांत करून १९ व्या श्लोकांत अंगाचें महत्व सांगितलें आहे. पुढच्या तीन श्लोकांत तीन मूढतेंचें विवेचन करून नंतर गर्व त्यागावे हें सांगितलें आहे. या पुढें २५ ते ३१ हे सात श्लोक सम्यग्दर्शनाचा ठसा लोकांचे मनावर चांगला उठावा ह्मणून सम्यक्त्वाचा महिमा लिहिला आहे.]

# ॥ दुसरा परिच्छेद प्रारंभः ॥ २ ॥

ज्ञानाचें लक्षण.

अन्यूनमनतिरिक्तं

याथातथ्यं विना च विपरीतात ॥

निस्संदेहं वेद य-

दाहुस्तज्ज्ञानमागमिनः ॥ १ ॥

अर्थ–उणें, अधिक व उलटें नसून जसें अमेल तसें संशयरहित जाणणें, त्याला सर्वज्ञांनीं ज्ञान असें ह्मटलें आहे.

प्रथमानुयोगाचें लक्षण.

प्रथमानुयोगमर्था-

ख्यानं चरितं पुराणमपि पुण्यं ॥

बोधिसमाधिनिधानं

बोधति बोधः समीचीनः ॥ २ ॥

अर्थ–ज्यांत धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष अशा चारी पुरुषार्थांचें व्याख्यान असून त्रेसष्ट शलाका पुरुषांचीं चरित्रें व एकेकांचीं पुराणें असतात, व जें ऐकल्या-

पासून पुण्य उत्पन्न होतें, जें रत्नत्रय आ-
णि ध्यान यांचें स्थान आहे. अशा प्रथ-
मानुयोगशास्त्रास सम्यग्ज्ञान जाणतें.

करणानुयोगाचें लक्षण.

लोकालोकविभक्ते-
युगपरिवृत्तेश्चतुर्गतीनां च ॥
आदर्शमिव तथामति-
रवैति करणानुयोगं च ॥ ३ ॥

अर्थ—ज्यांत लोक आणि अलोक ह्यांचे
भेद वर्णन केले आहेत, उत्सर्पिणी आणि
अवसर्पिणी अशा कालांच्या परिवर्तनांचें.
आणि चार गतींच्या परिवर्तनांचें दर्पणा-
सारखें स्पष्ट वर्णन आहे, अशा करणानु-
योगशास्त्रास सम्यग्ज्ञान जाणतें.

चरणानुयोगाचें लक्षण.

गृहमेध्यनगाराणां
चारित्रोत्पत्तिवृद्धिरक्षांगं ॥
चरणानुयोगसमयं
सम्यग्ज्ञानं विजानाति ॥ ४ ॥

अर्थ—ज्यांमध्यें गृहस्थ आणि मुनी यांच्या आचरणाची उत्पत्ति, वृद्धि आणि रक्षणाचे उपाय वर्णन केले आहेत, अशा करणानुयोगशास्त्रास सम्यग्ज्ञान जाणतें.

द्रव्यानुयोगाचें लक्षण.

जीवाजीवसुतत्वे
पुण्यापुण्ये च बंधमोक्षौ च ॥
द्रव्यानुयोगदीपः
श्रुतविद्यालोकमाननुते ॥ ५ ॥

अर्थ—द्रव्यानुयोगरूपी दिवा, (शास्त्र) जीव आणि अजीव ह्या उत्तम तत्वांमध्यें तसेंच पुण्य आणि पाप, बंध आणि मोक्ष यांमध्यें ज्ञानाचा प्रकाश वाढवितो.

श्रेष्ठज्ञात्याचें लक्षण.

पापमरातिर्धर्मो
बंधुर्जीवस्य चेति निश्चिन्वन् ॥
समयं यदि जानीते
श्रेयो ज्ञाता ध्रुवं भवति ॥ ६ ॥

अर्थ—पाप हा जीवाचा शत्रु आहे, आणि धर्म हा जीवाचा बंधु आहे. असा नित्य निश्चय ( विचार ) करून जो शास्त्राला जाणतो तो उत्कृष्टज्ञाता [ कल्याणाला जाणणारा ] होय ॥

॥ इति श्रीसमंतभद्रविरचिते रत्नकरंडनाम्नि उपासकाध्ययने सम्यग्ज्ञानवर्णनो नाम द्वितीयः परिच्छेदः ॥ २ ॥

अर्थ—याप्रमाणें समंतभद्रस्वामींनीं रचिलेल्या रत्नकरंडश्रावकाचारांतील सम्यग्ज्ञानवर्णन नांवाचा दुसरा भाग समाप्त झाला ॥ २ ॥

उक्तंच मोक्षमार्गग्रंथे पृष्ठ. ४०६

जे जीव तत्वांचें सूक्ष्मवर्णन समजण्यास समर्थ नाहींत. अशा अल्पबुद्धिवा-

---

टीप—हा परिच्छेद संक्षिप्त असण्याचें कारण हेंच कीं, या चार अनुयोगांचे निरनिराळे मोठे मोठे ग्रथ आहेत, या ग्रथांचें वर्णन येथें थोड्याविस्तारांत करणें होऊं शकत नाहीं करितां त्यांचें नुसतें लक्षण (स्वरूप) येथें सांगितलें आहे.

नाम ( अनुचित मिथ्यादृष्टीस ) प्रथम जो उपदेश सांगणें त्यास प्रथमानुयोग ह्मणतात. असा अर्थ गोमट्टसार ग्रंथाच्या टीकेंत केला आहे.

१ संसाराची विचित्रदशा (पुण्याचें फल सुख व पापाचें फल दुःख ) आहे, पुण्यवान् पुरुषांची प्रवृत्ती इत्यादि चरित्रभागाचा उपदेश श्रवण करून अज्ञानास धर्ममार्गांत प्रवर्तन करण्याचा उपदेश प्रथमानुयोगाचे शास्त्रांत आहे. ज्यास तत्वज्ञान झालें आहे त्यास प्रथमानुयोगाच्या कथा उदाहरणरूप दिसतात. ज्या कथेंत धर्माचें वर्णन नाहीं त्यास कुकथा ह्मणतात.

२ करणानुयोगाचे शास्त्रांत गणितविषयाची विशेषता आहे. जसें केवलज्ञान्यानें लोकस्वरूप, कालस्वरूप. कर्मस्वरूप, प्रत्यक्ष जाणिलें, तसें करणानुयोगांत व्याख्यान केलें आहे. यांत अलंकाररूप वर्णन नाहीं.

( कमीजास्त व्याख्यान नाहीं ) आचारक्रियेचें वर्णन नाहीं. करणानुयोगाचा अभ्यास केल्यानें सर्वज्ञानीं सांगितलेल्या अकृत्रिम लोकस्वरूपाचा जाणपणा होतो व हें असें वर्णन जैनमतांतच आहे अन्यमतांत नाहीं. ( अन्यमतांत ब्रह्मा, विष्णु, महेश्वर, हे पृथ्वीचे कर्ता हर्ता मानतात व पृथ्वी फिरते इत्यादि असंभवित वाक्यें आहेत) असा पक्का निश्चय होतो, तेणेंकरून जैनमताचें सत्यश्रद्धान ( प्रीति ) उत्पन्न होऊन तत्वज्ञानाची प्राप्ति होते, व स्वर्ग नरकादिक सुख दुःखाच्या स्थानाचा जाणपणा होऊन पापकर्मास विमुख होतो व धर्मकृत्यास तत्पर होतो, अशा अभ्यासास उपयोग लावल्याने पापप्रवृत्ति स्वयमेव सुटून तत्काल पुण्य प्रवृत्ति होते व तत्वज्ञान निर्मल होतें.

३ जीवांची बुद्धि व शक्ती पाहून त्या अ-

नुसार उपदेश देऊन धर्मआचरण करवि-
ण्याचा उपदेश चरणानुयोगाच्या शास्त्रांत
आहे, व यांत व्यवहारधर्माचा व निश्चय-
धर्माचा असा दोन प्रकारचा उपदेश आहे.
व्यवहारधर्म (अरिहंतदेव, निर्ग्रंथगुरु,
दयाधर्म, ह्यांची प्रीति करणें, जिनशास्त्राचा
अभ्यास करणें, पंचाणुव्रत पाळणें, पंच म-
हाव्रत पाळणें, शक्त्यनुसार नेम घेणें.) नि-
श्चयधर्म (क्रोध मान माया लोभ दूर क-
रून परिणाम शुद्ध करणें, द्वादशानुप्रे-
क्षांचें चिंतवन करणें.) तीव्रकषायाचें कार्य
सोडउन मंदकषायाचें कार्य करण्याचा उ-
पदेश चरणानुयोगांत आहे. व्यापारादि
गृहआरंभ, विषयसेवन व कषाय हे ज्यां-
चे कमी झाले नाहींत त्यास जिनप्रतीष्ठा,
पूजा, प्रभावना, धर्मात्म्यास साह्यता दान
करण्याचा उपदेश आहे. व जसा जसा
कषाय कमी होईल तसा तसा अणुव्रत,

महाव्रत, हे अंगिकार करण्याचा उपदेश चरणानुयोगाच्या शास्त्रांत केला आहे.

४ चरणानुयोगामध्यें बाह्यक्रियांची मुख्यता धरून वर्णन आहे व द्रव्यानुयोगामध्यें आत्मपरिणामाची मुख्यता धरून वर्णन आहे. आणि राग व द्वेष रहित होणें अशा शुद्धोपयोगाचा उपदेश आहे. (भक्ति. व्रतादिक कार्यरूप परिणामाची हीनता दाखऊन आत्म्याचा अनुभव करण्याचे कार्यामध्यें प्रवर्तविण्याचा प्रयत्न आहे.) व जीवानां जीवादिक षद्द्रव्यांचें यथार्थ श्रद्धान होईल असे विशेषयुक्ति, हेतु, दृष्टांतादिकांचें निरूपण आहे. जरी जीवादिक वस्तु अभेद आहेत तरी त्यांच्यामध्यें कल्पना करून व्यवहारानें द्रव्यगुण पर्यादिकांचा भेद दाखविला आहे व वीतरागभाव वैराग्याचे कारण असा अध्यात्म उपदेश आहे.

# ॥ तिसरा परिच्छेद प्रारंभ ॥ ३ ॥

मोहतिमिरापहरणे
दर्शनलाभादवाप्तसंज्ञानः ॥
रागद्वेषनिवृत्त्यै
चरणं प्रतिपद्यते साधुः ॥ १ ॥

अर्थ–दर्शनमोहनी ( मिथ्यात्व ) कर्मरूपी अंधकाराचा नाश झाला असतां सम्यग्दर्शनाचा लाभ होतो. त्या वेळीं त्याचें ज्ञानही सम्यक्पणाला पावतें. नंतर तो (सम्यग्दृष्टी जीव ) रागद्वेष मावळण्यासाठीं चारित्राचा अंगिकार करितो.

चारित्राचें लक्षण.

हिंसानृतचौर्येभ्यो
मैथुनसेवापरिग्रहाभ्यां च ॥
पापप्रणालिकाभ्यो
विरतिः संज्ञस्य चारित्रं ॥ २ ॥

अर्थ–हिंसा, लबाडी, चोरी, मैथुन, आणि परिग्रह हे [ पांच ] पातकांचे नळ

आहेत, ह्यांचा त्याग करणें तें सम्यग्ज्ञानीचें चारित्र होय.

चारित्राचें भेदवर्णन.

सकलं विकलं चरणं
तत्सकलं सर्वसंगविरतानां ॥
अनगाराणां विकलं
सागाराणां ससंगानां ॥ ३ ॥

अर्थ—सकलचारित्र, व विकलचारित्र, असे चारित्राचे दोन भेद आहेत. संपूर्ण परिग्रह सोडणाऱ्या मुनीला सकल चारित्र होतें. आणि परिग्रहधारी गृहस्थीला विकल चारित्र होतें.

आतां विकल चारित्राचे भेद सांगतात. मुनिच्या चारित्राचे भेद श्रावकाचारांत येत नाहींत.

गृहिणां त्रेधा तिष्ठ-
त्यणुगुणशिक्षाव्रतात्मकं चरणं ॥
पंचत्रिचतुर्भेदं
त्रयं यथासंख्यमाख्यातं ॥ ४ ॥

अर्थ—गृहस्थांचें चारित्र अणुव्रत, गुणव्रत, आणि शिक्षाव्रत, असें तीन प्रकारचें आहे. यांचे अणुव्रताचे पांच भेद, गुणव्रताचे तीन भेद, आणि शिक्षाव्रताचे चार भेद. असे अनुक्रमें [१२] भेद आहेत.

अणुव्रताचें लक्षण.

प्राणातिपातवितथ-
व्याहारस्तेयकाममूर्छाभ्यः ॥
स्थूलेभ्यः पापेभ्यो
व्युपरमणमणुव्रतंभवति ॥ ५ ॥

अर्थ— हिंसा, लबाडी, चोरी, मैथुन, आणि परिग्रह ह्या स्थूल पातकांचा त्याग करणें हें अणुव्रत होय.

( १ ) अहिंसाअणुव्रताचें लक्षण.

संकल्पात्कृतकारित-
मननाद्योगत्रयस्य चरसत्वान् ॥
न हिनस्ति यत्तदाहुः
स्थूलवधाद्विरमणं निपुणाः ॥ ६ ॥

अर्थ—मन, वचन, काया, अशा तिन्ही योगांच्या संकल्पानें ( हेतुपूर्वक ) आणि कृत कारित अनुमोदनांनीं चलन करणाऱ्या त्रस ( बेइंद्री, तीनइंद्री, च्यारइंद्री, पंचेंद्री, ) जीवाना न मारणें, याला निपुण पुरुष ( गणधरादिक ) स्थूलहिंसाचात्याग ( अहिंसाअणुव्रत ) ह्मणतात.

अहिंसाअणुव्रताचे पांच अतीचार.

छेदनबंधनपीडन-
मतिभारारोपणं व्यतीचाराः ॥
आहारवारणापि च
स्थूलवधाद्व्युपरतेः पंच ॥ ७ ॥

अर्थ—शरीराचे अवयव तोडणें, अटकेंत ठेवणें, छडीनें वगैरे ठोकणें, मर्यादेपेक्षां जास्त ओझें लादणें, आणि खाण्यापिण्याला प्रतिबंध करणें. हे स्थूल हिंसेच्या त्यागाचे पांच अतिचार (दोष) आहेत.

( २ ) सत्यअणुव्रताचें लक्षण.

स्थूलमलीकं न वदति

न परान् वादयति सत्यमपि विपदे ॥

यत्तद्वदंति संतः

स्थूलमृषा वादवैरमणं ॥ ८ ॥

अर्थ–स्थूल ( संकटावह ) असत्य किंवा ज्या सत्य भाषणापासून संकट येईल असलें सत्य देखील स्वतः बोलत नाहीं आणि इतरांकडून बोलवीत नाहीं, ह्यांस साधुलोक स्थूलअसत्यभाषणत्याग ( सत्यअणुव्रत ) ह्मणतात.

सत्यअणुव्रताचे पांच अतिचार.

परिवादरहोभ्याख्या

पैशून्यं कूटलेखकरणं च ॥

न्यासापहारतापि च

व्यतिक्रमाः पंच सत्यस्य ॥ ९ ॥

अर्थ–मिथ्या उपदेश देणें, दुसऱ्याची गुप्त गोष्ट प्रसिद्ध करणें, चहाडी सांगणें,

खोटा मजकूर लिहिणें, आणि कोणी ठे-
वलेलें द्रव्य विसरून कमी मागितल्यास
त्याला तितकेंच कमी सांगणें, असे पांच,
सत्याणुव्रताचे अतिचार आहेत.

( ३ ) अचौर्यअणुव्रताचें लक्षण.

निहितं वा पतितं वा
सुविस्मृतं वा परस्वमविसृष्टं ॥
न हरति यन्न च दत्ते
तदकृशचौर्यादुपारमणं ॥ १० ॥

अर्थ—ठेवलेलें, किंवा पडलेलें, किंवा
विसरलेलें किंवा न दिलेलें, असें परद्रव्य
न घेणें किंवा न दुसऱ्यास देणें, त्याला
स्थूलचोरीचा त्याग ( अचौर्य अणुव्रत )
ह्मणतात.

अचौर्य अणुव्रताचे पांच अतिचार.

चौरप्रयोगचौरा-
र्थादानविलोपसदृशसन्मिश्राः ॥
हीनाधिकविनिमानं
पंचास्तेये व्यतीचाराः ॥ ११ ॥

अर्थ—चोरीचा उपाय दाखविणें, चोरीचा माल घेणें, नीतीविरुद्ध आणि राज्याच्या कायद्याविरुद्ध वागणें, जास्त किमतीच्या वस्तूंत हलक्या किमतीची वस्तु मिसळून व्यवहार करणें, उण्या मापानें देणें व मोठ्या मापानें [विकत] घेणें, हे पांच अतिचार अचौर्याणुव्रताचे आहेत.

(४) परस्त्रीत्याग अणुव्रताचें लक्षण.

न तु परदारान् गच्छति
न परान् गमयति च पापभीतेर्यत् ॥
सा परदारनिवृत्तिः
स्वदारसंतोषनामापि ॥ १२ ॥

अर्थ—पापाच्या भयास्तव जो परस्त्रीशीं संभोग करीत नाहीं किंवा दुसऱ्याकडून करवीत नाहीं त्याला परस्त्रीत्याग किंवा स्वस्त्रीसंतोष नांवाचें अणुव्रत ह्मणतात.

परस्त्रीत्यागव्रताचे पांच अतिचार.

अन्यविवाहाकरणा-
नंगक्रीडाविटत्वविपुलतृषः ॥

इत्वरिकागमनं चा-

स्मरस्य पंच व्यतीचाराः ॥ १३ ॥

अर्थ–दुसऱ्यांची लग्नें करणें, कामविषयाच्या इंद्रियाखेरीज इतर ठिकाणीं क्रीडा करणें, बीभत्स बोलणें किंवा बीभत्स क्रिया करणें, कामसेवनाची अतिशय तृष्णा ठेवणें. आणि व्यभिचारिणीचे घरीं जाणे, ( तिची सोबत ठेवणें. ) असे पांच अतिचार ब्रह्मचर्यअणुव्रताचे आहेत.

( ५ ) परिग्रहप्रमाण अणुव्रताचें लक्षण.

धनधान्यादिग्रंथं

परिमाय ततोधिकेषु निस्पृहता ॥

परिमितपरिग्रहः स्या-

दिच्छापरिमाणनामापि ॥ १४ ॥

अर्थ–धन धान्य वगैरे परिग्रहांची मर्यादा करून त्यापेक्षां जास्तीविषयीं इच्छा न ठेवणें, हें परिग्रहप्रमाण अणुव्रत होय. ह्याला इच्छापरिमाणही ह्मणतात.

### परिग्रहप्रमाण व्रताचे पांच अतिचार.

अतिवाहनातिसंग्रह-
विस्मयलोभातिभारवहनानि ॥
परिमितपरिग्रहस्य च
विक्षेपाः पंच कथ्यंते ॥ १५ ॥

अर्थ—प्रयोजनाशिवाय अधिक वाहन ( पश्वादिक ) ठेवणें, फाजील वस्तूंचा संग्रह करणें, दुसऱ्यांपाशीं पुष्कळ परिग्रह पाहून आश्चर्य मानणें, मिळालेल्या नफ्यापेक्षां अधिक लोभ करणें, आणि लोभानें वाजवीपेक्षां फाजील ओझें लादून नेणें. हे पांच अतिचार परिग्रहप्रमाण अणुव्रताचे सांगितले आहेत.

### अणुव्रत धारण करण्याचे फल.

पंचाणुव्रतनिधयो
निरतिक्रमणाः फलंति सुरलोकं ॥
यत्रावधिरष्टगुणाः
दिव्यशरीरं च लभ्यंते ॥ १६ ॥

अर्थ—अतिचार ( दोष ) रहित पांच अणुव्रतें धारण करणारांला स्वर्गलोकींचें फल ( जन्म ) प्राप्त होतें. जेथें अवधिज्ञान, आठ रिद्धि, आणि सप्तधातूंरहित दिव्य शरीर हीं प्राप्त होतात.

आठ मूळगुण.

मद्यमांसमधुत्यागैः
महाणुव्रतपंचकं ॥
अष्टौ मूलगुणानाहु-
र्गृहिणां श्रमणोत्तमाः ॥ १७ ॥

अर्थ— दारू, मांस. आणि मध ह्या तिहींचा त्याग करणें आणि पांच अणुव्रतें पाळणें हे श्रावकाचे आठ मूळगुण आहेत, असें गणधरांनीं सांगितलें आहे.

॥ इति श्रीसमंतभद्रविरचिते रत्नकरंडनाम्नि उपासकाध्ययने अणुव्रतवर्णनो नाम तृतीयः परिच्छेदः ॥ ३ ॥

अर्थ—याप्रमाणें समंतभद्रस्वामींनीं रचिलेल्या रत्नकरंडउपासकाध्ययनांतील अणुव्रतवर्णन नांवाचा तिसरा भाग समाप्त झाला ॥ ३ ॥

[ या परिच्छेदांत सांगितल्याप्रमाणें पांच अणुव्रतें अतिचार ( दोष ) रहित जो पालन करितो व मांस, दारू, आणि मध यांचा त्याग करितो तो श्रावक ह्मणविण्यास योग्य होतो. आणि ज्यास ही योग्यता आली आहे, त्यास सरकारचे नीतिविषयक ( फौजदारी ) कायदे सहज पाळले जातात. ह्मणजे सामान्य श्रावक देखील उत्तम नागरीक होतो असें ह्मणण्यास हरकत नाहीं. ]

# ॥ चवथा परिच्छेद प्रारंभ ॥ ४ ॥

## तीन गुणव्रत वर्णन.

दिग्व्रतमनर्थदंड-
व्रतं च भोगोपभोगपरिमाणं ॥
अनुबृंहणाद्गुणाना-
माख्यांति गुणव्रतान्यार्याः ॥ १ ॥

अर्थ-मूळ गुणांची वृद्धि करणारे आहेत ह्मणून आचार्यांनीं-दिग्व्रत, अनर्थदंड, आणि भोगोपभोगपरिमाण, याला गुण व्रतें असें नांव दिलें आहे.

### ( १ ) दिग्व्रताचें लक्षण.

दिग्वलयं परिगणितं
कृत्वाऽतोहं बहिर्न यास्यामि ॥
इति संकल्पो दिग्व्रत-
मामृत्यणुपापविनिवृत्त्यै ॥ २ ॥

अर्थ-सूक्ष्म पापांच्या निवारणार्थ दहा दिशांमध्यें अमुक दिशेला अमुक लांबी-

च्या बाहेर जाणार नाहीं, असा संकल्प मृत्युपर्यंतचा करणें तें दिग्व्रत आहे.

### दिग्व्रताचे पांच अतिचार.

ऊर्ध्वाधस्तात्तिर्य-
ग्व्यतिपाताः क्षेत्रवृद्धिरवधीनां ॥
विस्मरणं दिग्विरते-
रत्याशाः पंच मन्यंते ॥ ३ ॥

अर्थ—उंच दिशेची, खोल दिशेची, आणि विदिशेची, केलेली मर्यादा उल्लंघन करून अधिक जाणें, केलेल्या क्षेत्र मर्यादा वाढविणें, आणि केलेल्या मर्यादा विसरणें, हे पांच दिग्व्रताचे अतिचार समजावे.

### दिग्व्रताचें फळ.

अवधेर्बहिरणुपापं
प्रतिविरतेर्दिग्व्रतानि धारयतां ॥
पंचमहाव्रतपरिणाति-
मणुव्रतानि प्रपद्यंते ॥ ४ ॥

अर्थ–दिग्व्रत धारण करणारांला मर्यादा केलेल्या प्रदेशाबाहेरचें सूक्ष्म पातक घडत नाहीं ह्मणून त्यांचीं अणुव्रतें देखील पांच महाव्रतांच्या भावांला (फलाला) प्राप्त होतात.

(२) अनर्थदंड गुणव्रताचें लक्षण.

अभ्यंतरं दिगवधे-
रपार्थकेभ्यः सपापयोगेभ्यः ॥
विरमणमनर्थदंड-
व्रतं विदुर्व्रतधराग्रण्यः ॥ ५ ॥

अर्थ–आपण दिशांच्या मर्यादा ज्या केल्या असतील त्यांच्या आंतील विनाकारण घडणाऱ्या मन, वचन, कायेच्या पातकांचा त्याग करणें यांस गणधरदेव अनर्थदंडव्रत ह्मणतात.

अनर्थदंडाचे पांच भेद.

पापोपदेशहिंसा-
दानापध्यानदुःश्रुतीः पंच ॥

प्राहुः प्रमादचर्या-
मनर्थदंडानदंडधराः ॥ ६ ॥

अर्थ–पापोपदेश, हिंसादान, अपध्यान, दुःश्रुति, आणि प्रमादचर्या, असे अनर्थदंडाचे पांच भेद गणधरदेवांनीं सांगिगिले आहेत.

(१) पापोपदेश अनर्थदंडाचें लक्षण.

तिर्य्यक्क्लेशवणिज्या-
हिंसारंभप्रलंभनादीनां ॥
प्रसवः कथाप्रसंगः
स्मर्तव्यः पाप उपदेशः ॥ ७ ॥

अर्थ– पशुपक्ष्यादिकांस दुःख उत्पन्न होईल असा उपदेश करणें, व्यापाराचा उपदेश करणें, हिंसा आणि आरंभ उत्पन्न होईल असा उपदेश करणें, कपटाचा आणि फसविण्याचा उपदेश करणें ह्यांस पापोपदेश नांवाचा अनर्थदंड ह्मणतात.

( २ ) हिंसादान अनर्थदंडाचें लक्षण.

परशुकृपाणखनित्र-
ज्वलनायुधशृंगिशृंखलादीना ॥
वधहेतूनां दानं
हिंसादानं ब्रुवंति बुधाः ॥ ८ ॥

अर्थ—कुऱ्हाड, तरवार, कुदळ, अग्नि, हत्यार, विष, बेडी, इत्यादि प्राणहरण होणाऱ्या वस्तूंचें दान देणें, यांस हिंसादान [ अनर्थदंड ] असें— गणधरदेवांनीं ह्मटलें आहे.

( ३ ) अपध्यान अनर्थदंडाचें लक्षण.

बंधवधच्छेदादे-
र्द्वेषाद्रागाच्च परकलत्रादेः ॥
आध्यानमपध्यानं
शासति जिनशासने विशदाः ॥९॥

अर्थ—कोणाही प्राण्याला द्वेषबुद्धीनें बंधांत घालण्याविषयीं, मारण्याविषयीं, अथवा त्याचेच अवयव तोडण्याविषयीं चिं-

तवन करणें, आणि कामबुद्धीनें परस्त्री वगैरेचें चिंतवन करणें, यांस जैनधर्मांतील विद्वानांनीं अपध्यान ( अनर्थदंड ) असें ह्मटलें आहे.

( ४ ) दुःश्रुति अनर्थदंडाचें लक्षण.

आरंभसंगसाहस-
मिथ्यात्वद्वेषरागमदमदनैः ॥
चेतः कलुषयतां श्रुति-
रवधीनां दुःश्रुतिर्भवति ॥ १० ॥

अर्थ—आरंभ, परिग्रह, साहस, मिथ्यात्व, वैर, प्रीति, गर्व, आणि कामविकार ह्यांचें वर्णन मनाला बिघडविणारें आहे ह्मणून अशा वर्णनाचें पुस्तक ऐकणें ती दुःश्रुति [ अनर्थदंड ] आहे.

( ५ ) प्रमादचर्या अनर्थदंडाचें लक्षण.

क्षितिसलिलदहनपवना-
रंभ विफलं वनस्पतिच्छेदं ॥
सरणं सारणमपि च
प्रमादचर्यां प्रभाषंते ॥ ११ ॥

अर्थ—विनाकारण जमीन खोदणें, विनाकारण पाणी सांडणें, विनाकारण अग्नि पेटविणें, विनाकारण वारा घालणें, विनाकारण वनस्पति तोडणें, विनाकारण चालणें, व चालविणें, ह्या कृत्यांस प्रमादचर्या अनर्थदंड ह्मणतात.

अनर्थदंडव्रताचें पांच अतिचार.

कंदर्पं कौत्कुच्यं
मौखर्यमतिप्रसाधनं पंच ॥
असमीक्ष्य चाधिकरणं
व्यतीतयोनर्थदंडकृद्विरतेः ॥ १२ ॥

अर्थ—विनाकारण बीभत्स बोलणें, शरीरानें बीभत्स क्रिया करणें, वृथा धीटतेनें बडबडणें, वृथा उपभोगाची सामग्री वाढविणे, कामाचा अजमास न करितां अधिक करणें, हे पांच अतिचार अनर्थदंडव्रताचे आहेत.

( ३ ) भोगोपभोग परिमाण गुणव्रताचें लक्षण.

अक्षार्थानां परिसं-
ख्यानं भोगोपभोगपरिमाणं ॥
अर्थवतामप्यवधौ
रागरतीनां तनूकृतये ॥ १३ ॥

अर्थ–परिग्रहाचें जें प्रमाण केलें असेल त्यांत देखील लालसा (प्रीति) कमी व्हावी ह्मणून प्रयोजनभूतही इंद्रियांच्या विषयांची ( भोगोपभोगांची ) मोताद् (संख्या) करणें, यास भोगोपभोगपरिमाणगुणव्रत ह्मणावें.

भोगाचें व उपभोगाचें लक्षण.

भुक्त्वा परिहर्तव्यो
भोगो भुक्त्वा पुनश्च भोक्तव्यः ॥
उपभोगोशनवसन-
प्रभृतिः पंचेंद्रियो विषयः ॥ १४ ॥

अर्थ–पंचेंद्रिय विषयांचे जितके पदार्थ एकदां भोगलेले पुनः भोगतां येत नाहींत

[ असे–अन्न,पुष्प, गंध वगैरे ] यांस भोग ह्मणतात. आणि पुनः पुनः भोगतां येतात [ स्त्री, वस्त्र, डागिने, घर, वाहन वगैरे ] ह्यांस उपभोग ह्मणतात.

भोगोपभोग परिमाणाचे पांच भेद आहेत, ते त्रसघात, प्रमाद, बहुवध, अनिष्ट, आणि अनुपसेव्य,

(१।२) त्रसघात व प्रमादत्याग वर्णन.

त्रसहतिपरिहरणार्थं
क्षौद्रं पिशितं प्रमादपरिहृतये ॥
मद्यं च वर्जनीयं
जिनचरणौ शरणमुपयातैः॥ १५ ॥

अर्थ–जिनेश्वराच्या पायीं शरण असणाऱ्या लोकांनीं त्रसजीवांचा घात होऊं नये ह्मणून मध व मांस खाऊं नये आणि प्रमाद येऊं नये ह्मणून दारू पीऊं नये.

(३) बहुवध त्याग वर्णन.

अल्पफलबहुविघाता–
न्मूलकमार्द्राणि शंगबेराणि ॥
नवनीतनिंबकुसुमं
कैतकमित्येवमवहेयं ॥ १६ ॥

अर्थ– ज्यामध्यें फल थोडें असून पुष्कळ घात ( हिंसा ) होतो असें कंदमूळ, ओले आलें, लोणी निंबाचीं फुलें, केतकीची फुलें वगैरे खाऊं नयेत.

(४-५) अनिष्ट व अनुपसेव्य वर्णन.

यदनिष्टं तद्व्रतये-
द्यच्चानुपसेव्यमेतदपि जह्यात् ॥
अभिसंधिकृताविरति-
र्विषयाद्योग्याद्व्रतं भवति ॥ १७ ॥

अर्थ–जें आपल्या प्रकृतीला मानत नसेल त्यास अनिष्ट ह्मणतात त्याचा त्याग करणें. [ हत्ती, घोडे, पालखी, डागिणे, इत्यादि वस्तूंपैकीं अमुक इतकेंच माझ्या

उपयोगाला पुरे आहेत, जास्तीची जरूरी नाहीं, अशा समजूतीनें फाजील असले-ल्या वस्तूंचा त्याग करणें यासही अनिष्ट-त्याग ह्मणतात.

अवश्य लागणाऱ्या वस्तूंमध्येंही अनेक रंगांच्या वस्त्रांपैकीं आणि विकार उत्पन्न होतील अशा पोषाखांपैकीं जे पदार्थ से-वन करण्यास योग्य नाहींत अशा पदार्थां-चा आजन्म त्याग करणें, अथवा तशी श-क्ति नसल्यास कांहीं कालपर्यंत मर्या-दा करून त्याग करणें, यास अनुपसेव्य ह्मणतात.

यम व नियमाचें लक्षण.

नियमो यमश्च विहितौ
द्वेधा भोगोपभोगसंहारात् ॥
नियमः परिमितकालो
यावज्जीवं यमो ध्रियते ॥ १८ ॥

अर्थ—भोगोपभोगांच्या त्यागामध्यें दो-न भेद केले आहेत, एक नियम आणि

दुसरा यम. काळाचें प्रमाण बांधून नेम घेणें ह्याला नियम ह्मणतात. आणि जन्म-भरपर्यंतचा नेम घेणें ह्यास यम ह्मणतात.

भोजनवाहनशयन-
स्नानपवित्रांगरागकुसुमेषु ॥
तांबूलवसनभूषण-
मन्मथसंगीतगीतेषु ॥ १९ ॥
अद्य दिवा रजनी वा
पक्षो मासस्तथर्तुरयनं वा ॥
इति कालपरिच्छित्त्या
प्रत्याख्यानं भवेन्नियमः ॥ २० ॥

अर्थ—भोजन, वाहन, शयन, स्नान, सुगंधलेपन, पुष्प, तांबूल, वस्त्र, अलंकार, कामभोग, नृत्य, गाणें, वाजविणें ह्या गोष्टी करण्याविषयीं, आज एक दिवस अथवा एक रात्र, किंवा पंधरवडा, महिना, दोन महिने, साहा महिने, असें काळाचें प्रमाण करून त्याग करणें हा नियम होय.

विषयविषतोनुपेक्षा-

ऽनुस्मृतिरतिलौल्यमातितृषानुभवौ ॥

भोगोपभोगपरिमा-

व्यतिक्रमाः पंच कथ्यंते ॥ २१ ॥

अर्थ—विषयांचा आदर करणें, भोगलेल्या विषयांची आठवण करणें, विषय भोगतांना अत्यंत आसक्त होणें, विषय भोगाविषयीं अतिशय तृष्णा ठेवणें, विषय भोगीत नसत्यावेळीं ते भोगीत आहें असें मनांत आणणें, असे हें पांच अतिचार भोगपभोगपरिमाणगुणव्रताचे आहेत.

इति श्रीसमंतभद्रविरचिते रत्नकरंडनाम्नि उपासकाध्ययने गुणव्रतवर्णनो नाम चतुर्थः परिच्छेदः ॥ ४ ॥

अर्थ—याप्रमाणें श्रीसमंतभद्रस्वामींनीं रचिलेल्या उपासकाध्ययनांतील गुणव्रतवर्णन नांवाचा चवथा भाग समाप्त झाला ॥४॥

# ॥ पांचवा परिच्छेद प्रारंभ ॥ ५ ॥

## चार शिक्षाव्रत वर्णन.

देशावकाशिकं वा
सामायिकं प्रोषधोपवासो वा ॥
वैय्यावृत्त्यं शिक्षा-
व्रतानि चत्वारि शिष्टानि ॥ १ ॥

अर्थ—देशावकाशिक, सामायिक, प्रोषधोपवास, आणि वैय्यावृत्त्य अशीं चार शिक्षाव्रतें सांगितलीं आहेत.

### ( १ ) देशावकाशिक शिक्षाव्रताचें लक्षण.

देशावकाशिकं स्या-
त्कालपरिच्छेदनेन देशस्य ॥
प्रत्यहमणुव्रतानां
प्रतिसंहारो विशालस्य ॥ २ ॥

अर्थ—दिग्व्रतामध्यें परिमाण केलेल्या मोठ्या प्रदेशास ( क्षेत्रास ) कालाची मर्यादा करून प्रतिदिन कमी करणें, हें अणुव्रतधारीचें देशावकाशिक व्रत होय.

देशावकाशिक शिक्षाव्रताचे पांच अतिचार.

प्रेषणशब्दानयनं
रूपाभिव्यक्तिपुद्गलक्षेपः ॥
देशावकाशिकस्य
व्यपदिश्यंतेऽत्ययाः पंच ॥ ३ ॥

अर्थ–मर्यादा केलेल्या प्रदेशाबाहेर कोणास पाठविणें, केलेल्या मर्यादेचे बाहेरून कोणी जात असल्यास त्याला शब्दानें खुणविणें, केलेल्या मर्यादा बाहेरची वस्तु घेऊन येण्यास नेत्रानें खुणविणें, केलेल्या प्रदेशाबाहेरची वस्तु घेऊन येण्यास शरीरानें खुणविणें, आणि बाहेरच्या प्रदेशांत दगड वगैरे फेकणें, असे पांच अतिचार देशावकाशिक शिक्षाव्रताचे आहेत.

देशावकाशिक शिक्षाव्रताचें फळ.

सीमंतानां परतः
स्थूलेतरपंचपापसंत्यागात् ॥

देशावकाशिकेन च

महाव्रतानि प्रसाध्यंते ॥ ४ ॥

अर्थ—देशावकाशिकव्रत धारण करणाऱ्यानें ज्या मर्यादा केल्या असतील त्यांच्या बाहेरील सूक्ष्म पांच पातकांचाही त्याग झाल्यामुळें त्याची देशावकाशिक [ पंचअणु ] व्रतें देखील महाव्रताला साधतात.

( २ ) सामायिक शिक्षाव्रताचें लक्षण.

आसमयमुक्तिमुक्तं

पंचाघानामशेषभावेन ॥

सर्वत्र च सामायिकाः

सामायिकं नाम शंसंति ॥ ५ ॥

अर्थ—समयाचें लक्षण पुढील श्लोकांत लिहिलें आहे त्या समयाला सोडीपर्यंत मन, वचन, काया, कृत, कारित, अनुमोदनांनीं पांच पापांचा कांहीं काल पर्यंत सर्व ठिकाणीं त्याग करणें ह्याला गणधरांनीं सामायिक असें ह्मटलें आहे.

### समायाचें लक्षण.

मूर्धरुहमुष्टिवासो
　　बंधं पर्यंकबंधनं चापि ॥
स्थानमुपवेशनं वा
　　समयं जानंति समयज्ञाः ॥ ६ ॥

अर्थ—सामायिक करतेवेळीं केश मोकळे असल्यास त्याला गांठ द्यावी, अंगावरचें वस्त्र मोकळें असल्यास त्याला गांठ द्यावी, पद्मासन घालून हातावर हात ठेऊन बसावें, किंवा उभ्यानें कायोत्सर्गासन घालावें अथवा सामान्यपणें बैठकीचें आसन घालणें हें सामायिकाचें चिन्ह ( लक्षण ) आहे असें शास्त्रकार समजतात.

### सामायिक करण्याचीं स्थानें.

एकांते सामायिकं
　　निर्व्याक्षेपे वनेषु वास्तुषु च ॥
चैत्यालयेषु वापि च
　　परिचेतव्यं प्रसन्नधिया ॥ ७ ॥

अर्थ—निरुपद्रवस्थळीं, एकांत ठिकाणीं, वनांत, घरांत, देवळांत, वगैरे अशा ठिकाणीं प्रसन्न मनानें सामायिक नित्य करावें.

सामायिकाच्या वेळचें चिंतवन.

अशरणमशुभमनित्यं
दुःखमनात्मानमावसामिभवं ॥
मोक्षस्तद्विपरीता-
त्मेति ध्यायंतु सामायिके ॥ ८ ॥

अर्थ—मी ज्या संसारांत पडलों आहें तो संसार असरण आहे, अशुभ आहे, नाशवंत आहे, दुःखदायक आहे, आत्मस्वरूपरहित ( परका ) आहे आणि मोक्ष ह्याच्या विरुद्ध स्वरूपाचा आहे· असें सामायिकाचे वेळीं ध्यान ( चिंतवन ) करावें·

सामायिकाचे वेळीं परिसहसहन करणें.

शीतोष्णदंशमशकं
परिषहमुपसर्गमपि च मौनधराः ॥

सामायिकं प्रतिपन्ना

अधिकुर्वीरन्नचलयोगाः ॥ ९ ॥

अर्थ—सामायिक करणारे मौन धरिता-त आणि मन वचन कायेच्या योगाला स्थिर करून थंडी, ऊन, डांस मच्छरादिक प्राण्यांपासून होणारा त्रास इत्यादि परिष-ह, आणि कोणी उपसर्ग केल्यास तोही सहन करितात.

सामयिक शिक्षाव्रताचे अतिचार.

वाक्कायमानसानां

दुःप्रणिधानान्यनादरास्मरणे ॥

सामायिकस्यातिगमा

व्यज्यंते पंच भावेन ॥ १० ॥

अर्थ—सामायिकाचे वेळीं मन संकल्प विकल्प करणें, वचन वशीभूत न ठेवणें, शरीराची चळवळ करणें, सामायिकाविष-यीं अनादर करणें, सामायिकाचा काल व पाठ विसरणें, असे पांच प्रकारें सामायि-काचे अतिचार आहेत.

सामायिकाची महिमा.

सामायिके सारंभाः
परिग्रहा नैव संति सर्वेंपि ॥
चेलोपसृष्टमुनिरिव
गृही तदा याति यतिभावं ॥११॥

अर्थ–सामायिकाचे वेळीं आरंभ आणि सर्वपरिग्रह वर्ज असतात यामुळें त्यावेळीं गृहस्थी देखील वस्त्रानें झांकलेल्या मुनीसारखा यति पणाला प्राप्त होतो. ( मुनीपेक्षां वस्त्रच कायतें ह्याला जास्त असतें. )

( ३ ) प्रोषधोपवास शिक्षाव्रताचें लक्षण.

पर्वण्यष्टम्यां च
ज्ञातव्यः प्रोषधोपवासस्तु ॥
चतुरभ्यवहाराणां
प्रत्याख्यानं सदेच्छामि ॥ १२ ॥

अर्थ–नेहमीं चतुर्दशी आणि अष्टमीच्या दिवशीं [ प्रोषधोपवासव्रत करण्याच्या ] इच्छेनें चार प्रकारच्या आहारांचा त्याग करणें हें प्रोषधोपवासशिक्षाव्रत समजावें.

प्रोषधोपवासांत त्याज्य वस्तु.

पंचानां पापाना-
मलंक्रियारंभगंधपुष्पाणां ॥
स्नानांजननस्याना-
मुपवासे परिहृतिं कुर्यात् ॥ १३ ॥

अर्थ—उपवासांत हिंसादिक पांच पातकें, अलंकार, पापारंभ, गंध, पुष्प, स्नान, अंजन, नस्य, वगैरे कामांचा त्याग करावा.

उपवासांतील कर्तव्य.

धर्मामृतं सतृष्णः
श्रवणाभ्यां पिबतु पाययेद्वान्यात् ॥
ज्ञानध्यानपरो वा
भवतूपवसन्नतंद्रालुः ॥ १४ ॥

अर्थ—उपवासकरणाऱ्यानें आळस न करितां कानांनीं अभिलाषपूर्वक धर्मरूपी अमृत प्राशन करावें ( ऐकावें ) आणि दुसऱ्यास पाजावें ( ऐकवावें ) व ज्ञान-

प्राप्तीमध्यें आणि ध्यान करण्यामध्यें तत्पर असावें.

प्रोषध व उपवासाचें लक्षण.

चतुराहारविसर्जन-
मुपवासः प्रोषधः सकृद्भुक्तिः ॥
स प्रोषधोपवासो
यदुपोष्यारंभमाचरति ॥ १५ ॥

अर्थ—खाणें, पिणें, स्वादणें आणि चाटणें असा चार प्रकारच्या आहारांचा त्याग करणें यास उपवास ह्मणतात; एकच वेळ जेवणें यास प्रोषध ह्मणतात; आणि उपवासाचे आदले दिवशीं एक वेळ जेवणें दुसरें दिवशीं एकवेळा जेवणें नंतर आरंभयुक्त काम करणें यास प्रोषधोपवास ह्मणतात.

ग्रहणविसर्गास्तरणा-
न्यदृष्टमृष्टान्यनादरास्मरणे ॥
यत्प्रोषधोपवासे
व्यतिलंघनपंचकं तदिदं ॥ १६ ॥

अर्थ—न पाहतां न झाडतां उपकर्णादि पदार्थ घेणें, न पाहतां मलमूत्र टाकणें, न पाहतां न झाडतां बिछाना वगैरे टाकणें, भुकेच्या व्याकुळतेमुळें उपवासांत अनादर करणें, आवश्यक्रियांचें विस्मरण होणें, हे पांच अतिचार प्रोषधोपवास शिक्षाव्रताचे आहेत.

( ४ ) वैयावृत्त्य शिक्षाव्रताचें लक्षण.

दानं वैयावृत्त्यं
धर्माय तपोधनाय गुणनिधये ॥
अनपेक्षितोपचारो-
पक्रियमगृहाय विभवेन ॥ १७ ॥

अर्थ—रत्नत्रयधारी, परिग्रहरहित, तपस्वीला (मुनीला) भक्तीनें धर्मार्थ प्रत्युपकाराची इच्छा न धरितां विधियुक्त दान देणें यास वैयावृत्त्य ह्मणावें.

आहारौषधयोर-
प्युपकरणावासयोश्च दानेन ॥

वैयावृत्त्यं ब्रुवते
चतुरात्मत्वेन चतुरस्राः ॥ १८ ॥

अर्थ—वैयावृत्त्याचे चार भेद गणधरांनीं सांगितले आहेत. आहारदान, औषधदान, ज्ञानोपकरण (शास्त्र) दान, वस्तिकादान.

व्यापत्तिव्यपनोदः
पदयोः संवाहनं च गुणरागात् ॥
वैयावृत्त्यं यावा-
नुपग्रहोन्योपि संयमिनां ॥ १९ ॥

अर्थ—गुणावर प्रीति ठेऊन संयमी जनांच्या विपत्ती नाहींशा करणें, त्यांचे हातपाय रगडणें, वगैरे आणखी जितकी त्यांच्यावर उपकार करण्याचीं कृत्यें असतील त्या सर्वांस वैयावृत्त्य ह्मणावें.

नवपुण्यैः प्रतिपत्तिः
सप्तगुणसमाहितेन शुद्धेन ॥
अपसूनारंभाणा-
मार्याणामिष्यते दानं ॥ २० ॥

अर्थ–दाताराचे सप्तगुण[1] धारण कर- णाऱ्या शुद्ध श्रावकानें, पंचसूनो[2] व आ रंभरहित अशा आर्यपुरुषाचा (मुनीचा) नैऊ[3] प्रकारच्या भक्तीनें आदर सत्कार करणें यास दान ह्मणतात.

हरितपिधाननिधाने

ह्यनादरास्मरणमत्सरत्वानि ॥

वैयावृत्त्यस्यैते

व्यतिक्रमाः पंच कथ्यंते ॥ २१ ॥

अर्थ–हिरव्या पानांनीं आहार झांकणें हिरव्या पानांत आहार ठेवणें, पात्राचा अ- नादर करणें दानाचा विधि वगैरे विसरणें, आणि ईर्षेनें दान देणें, हे पांच अतिचार वैयावृत्त्य शिक्षाव्रताचे सांगितले आहेत.

---

१ श्रद्धा, शक्ति, भक्ति, चतुरत्व, लुब्धत्व, क्षमा, उदारत्व,

२ काडणें, दळणें, चूल पेटविणे, पाणीभरणें, घर सारविणें,

३ समोर जाणें, उच्चासन देणें, पादप्रक्षालन करणें, पूजा- करणें, नमस्कार करणें, मनःशुद्धि, वचनशुद्धि, कायशुद्धि, अन्नशुद्धि.

दानाचें फल.

क्षितिगतमिव वटबीजं
पात्रगतं दानमल्पमपि काले ॥
फलति च्छायाविभवं
बहुफलमिष्टं शरीरभृतां ॥ २२ ॥

अर्थ—जसें वडाचें बीज योग्यकाळीं जमिनींत टाकलें तर त्याचा छायायुक्त मोठा वृक्ष होतो, त्याप्रमाणें उत्तम पात्राला थोडेंदेखील दान दिल्यानें त्याचें फल प्राणिमात्राला माहात्म्य आणि संपत्तियुक्त अनेक प्रकारची इष्टसामग्री प्राप्त होते.

इति श्रीसमंतभद्रविरचिते रत्नकरंडनाम्नि उपासकाध्ययने शिक्षाव्रतवर्णनं नाम पंचमः परिच्छेदः ॥ ५ ॥

अर्थ—याप्रमाणें समंतभद्रस्वामींनीं रचिलेल्या रत्नकरंड उपासकाध्ययनांतील शिक्षाव्रतवर्णन नांवाचा पांचवा भाग समाप्त झाला ॥ ५ ॥

### सल्लेखनाची आवश्यकता.

अंतःक्रियाधिकरणं
तपःफलं सकलदर्शिनः स्तुवते ॥
तस्माद्यावद्विभवं
समाधिमरणे प्रयतितव्यं ॥ १ ॥

अर्थ—अंतसमयाची क्रिया सुधारणें हेंच तपाचें फल आहे असे सर्वज्ञ ह्मणतात. यास्तव आपल्या शक्त्यनुसार समाधि मरणाविषयीं प्रयत्न करावा.

### सल्लेखनाचें लक्षण.

उपसर्गे दुर्भिक्षे
जरसि रुजायां च निःप्रतीकारे ॥
धर्माय तनुविमोचन-
माहुः सल्लेखनामार्याः ॥ २ ॥

अर्थ—उपसर्ग, दुर्भिक्ष, ह्मातारपण, आणि रोग हे मिटण्यासारखे नसतील अशा प्रसंगीं रत्नत्रयधर्माला साधण्यासाठीं शरीराचा त्याग करणें यास सल्लेखना ह्मणतात.

समाधिमरणाची विधि.

स्नेहं वैरं संगं
परिग्रहं चापहाय शुद्धमनाः ॥
स्वजनं परजनमपि च
क्षांत्वा क्षमयेत्प्रियैर्वचनैः ॥ ३ ॥

अर्थ—सल्लेखना धारणा करणाऱ्या माणसांनीं [आपल्या कुटुंबादि इष्टमित्रांवरील] मोह सोडावा, [कोणाविषयीं मनांत वैर असल्यास तें] वैर सोडून द्यावें. [स्त्रीपुत्रादिकांची] सोबत सोडावी, [चोवीस प्रकारचे अंतर्बाह्य] परिग्रहांचा त्याग करावा व शुद्धमन करून गोड भाषणांनीं आपल्या आणि परकीय माणसांच्या अपराधांची क्षमा करावी; आणि आपणही त्यांजपासून क्षमा मागावी.

व्रतधारणक्रिया.

आलोच्य सर्वमेनः
कृतकारितमनुमतं च निर्व्याजं ॥

आरोपयेन्महाव्रत-
मामरणस्थायि निश्शेषं ॥ ४ ॥

अर्थ–आपण स्वतः केलेले, दुसऱ्याकडून करविलेले व कोणी करीत असतांना पसंत केलेले सर्व दोष निष्कपटपणानें आपल्या तोंडानें उच्चारून पांच प्रकारचीं महाव्रतें मरणापर्यंत आपण स्वीकारावीं.

शोकं भयमवसादं
क्लेदं कालुष्यमरतिमपि हित्वा ॥
सत्वोत्साहमुदीर्य च
मनः प्रसाद्यं श्रुतैरमृतैः ॥ ५ ॥

अर्थ–शोक, भय, खेद, स्नेह, राग, द्वेष तळमळ हे सोडून द्यावे, आणि बलोत्साह प्रगट करून, शास्त्ररूपी अमृतानें (शास्त्रश्रवण करून) आपलें मन प्रसन्न करावें.

आहार त्यागाची विधि.

आहारं परिहाप्य
क्रमशः स्निग्धं विवर्द्धयेत्पानं ॥

स्निग्धं च हापयित्वा
खरपानं पूरयेत्क्रमशः ॥ ६ ॥

अर्थ—क्रमाक्रमानें आहार कमी करून दूध पिऊन रहावें. नंतर क्रमाक्रमानें दूध कमी करून ताक पिऊन रहावे व नंतर-क्रमाक्रमानें ताक कमी करून शुद्ध (प्रासुक, उष्ण, ) पाणी पिऊन रहावें.

खरपानहापनामपि
कृत्वा कृत्वोपवासमपि शक्त्या ॥
पंचनमस्कारमना-
स्तनुं त्यजेत्सर्वयत्नेन ॥ ७ ॥

अर्थ—नंतर प्रासुक पाणी पिण्याचेंही सोडून देऊन शक्तीप्रमाणें उपोषण धारण करावें आणि व्रत, संयम, चारित्र, ध्यान, ह्यांविषयीं सावधान राहून पंचनमस्कारामध्यें लक्ष ठेऊन देहत्याग करावा.

जीवितमरणाशंसे
भयमित्रस्मृतिनिदाननामानः ॥

सल्लेखनातिचाराः
पंच जिनेंद्रैः समादिष्टाः ॥ ८ ॥

अर्थ—मरण येऊं नये अशी इच्छा करणें, मरण यावें असें इच्छिणें, भय बाळगणें, इष्टमित्र आप्तवर्गाचें स्मरण करणें, आणि पुढें अमुक मला मिळावें असें निदान बांधणें. असे पांच अतिचार सल्लेखनाव्रताचे जिनेंद्रदेवांनीं सांगितले आहेत.

निःश्रेयसमभ्युदयं
निस्तीरं दुस्तरं सुखांबुनिधिं ॥
निःपिबति पीतधर्मा
सर्वैर्दुःखैरनालीढः ॥ ९ ॥

अर्थ—धर्मामृत प्राशन करणारा [सल्लेखनाधारी] जीव [अहमिंद्रादि पदाच्या सुखपरंपरेला पुष्कळ काळपर्यंत भोगतो; ] आणि संपूर्ण दुःखापासून मुक्त होऊन अपार, दुस्तर, उत्कृष्ट अशा मोक्षमयसुखरूपी समुद्राचें जल पितो. (अनुभव घेतो.)

मोक्षाचें लक्षण.

जन्मजरामयमरणैः
शोकैर्दुःखैर्भयैश्च परिमुक्तं ॥
निर्वाणं शुद्धसुखं
निःश्रेयसमिष्यते नित्यं ॥ १० ॥

अर्थ—जन्म, वृद्धपण, रोग, मरण, शोक, दुःख आणि भय, हीं जेथें नसून शुद्ध (उपाधिरहित) सुख नेहमीं जेथें आहे त्याला निश्रेयस किंवा निर्वाण ह्मणजे मोक्ष ह्मणतात.

मुक्तजीवाचें लक्षण.

विद्यादर्शनशक्ति-
स्वास्थ्यप्रल्हादतृप्तिशुद्धियुजः ॥
निरतिशया निरवधयो
निःश्रेयसमावसंति सुखं ॥ ११ ॥

अर्थ—अनंतज्ञान, अनंतदर्शन, अनंतवीर्य, अनंतसुख, परमौदासीनता, विषयाविषयीं अनिच्छा, द्रव्यकर्म भावकर्मरूपी मलापासून रहितता, अशा गुणांनीं

युक्त मुक्तजीव हीनाधिकपणारहित अनं-
तकालपर्यंत मोक्षामध्यें सुखानें राहतात.

मुक्तजीवांचा स्थायिकपणा.

काले कल्पशतेपि च
गते शिवानां न विक्रिया लक्ष्या ॥
उत्पातोपि यदि स्यात्
त्रिलोकसंभ्रांतिकरणपटुः ॥ १२ ॥

अर्थ–त्रैलोक्याला भ्रांतींत पाडण्यासा-
रखा उत्पाद जरी झाला आणि शेंकडों
कल्पांचा काळ गेला तथापि मोक्षवासी जी-
वाला कांहीं फेरफार होत नाहीं.

इति श्रीसमंतभद्रविरचिते रत्नकरंडनाम्नि उपासकाध्ययने सल्लेखनाव्रतवर्णनो नाम षष्ठः परिच्छेदः ॥ ६ ॥

अर्थ–याप्रमाणें समंतभद्रस्वामींनीं र-
चिलेल्या रत्नकरंडउपासकाध्ययनांतील सल्ले-
खनाव्रतवर्णन नांवाचा साहवा भाग स-
माप्त झाला ॥ ६ ॥

पुरुषार्थसिध्युपाय ग्रंथे.

मरणान्तेऽवश्यमहं
विधिना सल्लेखनां करिष्यामि ॥
इति भावनापरिणतो
नागतमपि पालयेदिदं शीलं॥१२५॥

अर्थ—मरणसमयीं जरूर ह्या रीतीनें मी सल्लेखना(शरीरकृशीकरण ही बाह्य सल्लेखना व कषायकृशीकरण ही अंतः सल्लेखना) करीन,असा विचार करणारा मनुष्य, मरणा-चा प्रसंग येण्याच्या अगोदरपासूनच हें (सल्लेखना) व्रत पाळितो.

# ॥ सातवा परिच्छेदप्रारंभ ॥ ७ ॥

## एकादशप्रतिमावर्णन.

श्रावकपदानि देवै-
रेकादश देशितानि येषु खलु ॥
स्वगुणाः पूर्वगुणैः सह
संतिष्ठंते क्रमविवृद्धाः ॥ १ ॥

अर्थः—सर्वज्ञ देवांनीं श्रावकाच्या पायऱ्या ( प्रतिमा ) अकरा सांगितल्या आहेत. ज्या ज्या प्रतिमेमध्यें जे जे गुण असले पाहिजेत ते ते असून पूर्वींच्या प्रतिमेचे सर्व गुण क्रमाप्रमाणें वाढते असतात.

### ( १ ) दर्शनप्रतिमेचें लक्षण.

सम्यग्दर्शनशुद्धः
संसारशरीरभोगनिर्विण्णः ॥
पंचगुरुचरणशरणो
दर्शनिकस्तत्वपथगृह्यः ॥ २ ॥

अर्थः—जो संसार शरीरभोगाची विशेष आवड ठेवीत नाहीं. सम्यग्दर्शन नि-

मेल ( अतिचाररहित ) राखतो. पंचपरमेष्ठीच्या पायांशीं शरण असून तत्वाच्या ( सत्यार्थ ) मार्गाला ग्रहण करितो तो दर्शनप्रतिमाधारी श्रावक होय.

( २ ) व्रतप्रतिमेचें लक्षण.

निरतिक्रमणमणुव्रत-
पंचकमपि शीलसप्तकं चापि ॥
धारयते निःशल्यो
योसौ व्रतिनां मतो व्रतिकः ॥ ३ ॥

अर्थः—जो कपट, मिथ्यात्व, आणि निदान अशीं तीन शल्यें सोडितो, आणि अतिचाररहित पांच अणुव्रतें, शीलसप्तकें ( तीन गुणव्रतें आणि चार शिक्षाव्रतें, ) हीं धारण करितो तो व्रतप्रतिमाधारी श्रावक होय असें गणधर समजतात.

( ३ ) सामायिकप्रतिमाधारीचें लक्षण.

चतुरावर्तत्रितय-
श्चतुःप्रणामस्थितो यथाजातः ॥

सामायिको द्विनिषद्य-

त्रियोगशुद्धस्त्रिसंध्यमभिवंदी ॥४॥

अर्थः—सकाळीं, दोनप्रहरीं आणि संध्याकाळीं मन, वचन, काया शुद्ध करून बाह्याभ्यंतर परिग्रह सोडून दोन्ही हात जोडून तीन तीन वेळां चार नमस्कार चारी दिशांला करणें ही तिसरी सामायिक प्रतिमा होय.

( ४ ) प्रोषधप्रतिमाधारीचें लक्षण.

पर्वदिनेषु चतुर्ष्वपि

मासे मासे स्वशक्तिमनिगुह्य ॥

प्रोषधनियमविधायी

प्रणधिपरः प्रोषधानशनः ॥ ५ ॥

अर्थः—दर महिन्याच्या चार पर्वतिथीं (दोन अष्टमी आणि दोन चतुर्दशी) ला आपली शक्ति न छपवितां नेमानें प्रोषध करून शुभध्यानामध्यें तत्पर असणें ह्यास प्रोषधोपवास प्रतिमा ह्मणतात.

( ५ ) सचित्तत्यागप्रतिमेचें लक्षण.

मूलफलशाकशाखा-
करीरकंदप्रसूनबीजानि ॥
नामानि योत्ति सोयं
सचित्ताविरतो दयामूर्तिः ॥ ६ ॥

अर्थः—जो न पिकलेलें अथवा न शिजलेलें मूळ, फळ, पान, डाहाळी, गांठी, कंद, फूल आणि बीं जो खात नाहीं तो दयामूर्ति गृहस्थ सचित्तत्यागप्रतिमाधारी होय.

( ६ ) रात्रिभुक्तित्यागप्रतिमाचें लक्षण.

खाद्यं स्वाद्यं पानं
लेह्यं नाश्नाति यो विभावर्यां ॥
स च रात्रिभुक्तिविरतः
सत्वेष्वनुकम्पमानमनाः ॥ ७ ॥

अर्थः—जो प्राणिमात्रावर दया करणारा रात्रीं खाण्याचे पदार्थ, तांबूलादि पदार्थ, पिण्याचे पदार्थ, चाटण्याचे पदार्थ,अशा चार

प्रकारांपैकीं कांहीं खात नाहीं तो रात्रि-भुक्तित्याग प्रतिमाधारी होय.

( ७ ) ब्रह्मचर्यप्रतिमेचें लक्षण.

मलबीजं मलयोनिं
गलन्मलं पूतगंधिबीभत्सं ॥
पश्यन्नंगमनंगा-
द्विरमति यो ब्रह्मचारी सः ॥ ८ ॥

अर्थः—जो मलीनतेचें कारण, मलप्रवाही आणि दुर्गंध असून किळस उत्पन्न करणारें अशा अंगास पाहून कामविकाराचा (मैथुनाचा) त्याग करितो तो ब्रह्मचर्य प्रतिमाधारी होय.

( ८ ) आरंभत्याग प्रतिमेचें लक्षण.

सेवाकृषिवाणिज्य-
प्रमुखादारंभतो व्युपारमति ॥
प्राणातिपातहेतो-
र्योसावारंभविनिवृत्तः ॥ ९ ॥

अर्थः—जो हिंसेचें कारण, नोकरी, शे-

तकी, व्यापार इत्यादिक संसार आरंभाचा त्याग करितो तो आरंभत्याग प्रतिमाधारी श्रावक होय.

( ९ ) परिग्रहत्यागप्रतिमेचें लक्षण.

बाह्येषु दशसु वस्तुषु
ममत्वमुत्सृज्य निर्ममत्वरतः ॥
स्वस्थः संतोषपरः
परिचित्तपरिग्रहाद्विरतः ॥ १० ॥

अर्थः—जो बाह्य दहा प्रकारच्या परिग्रहांवरील ममत्व सोडून निर्ममत्वानें राहता आणि आत्मस्वरूपांत लीन असून संतोषवृत्ति धारण करितो तो परिचित परिग्रहत्यागप्रतिमाधारी होय.

( १० ) अनुमतित्यागप्रतिमेचें लक्षण.

अनुमतिरारंभे वा
परिग्रहे वैहिकेषु कर्मसु वा ॥
नास्ति खलु यस्य समधि-
रनुमतिविरतः स मंतव्यः ॥ ११ ॥

अर्थः—आरंभ ह्मणजे शेतकी व्यापारादिक, परिग्रह ह्मणजे धनधान्यादिक आणि ऐहिक ह्मणजे लग्नकार्यादिक इत्यादि कामांत जो संमति देत नाहीं तो समबुद्धि राहतो. तो अनुमतित्यागप्रतिमाधारी होय.

( ११ ) उत्कृष्ट श्रावकाचें लक्षण.

गृहतो मुनिवनमित्वा
गुरूपकंठे व्रतानि परिगृह्य ॥
भैक्ष्याशनस्तपस्य-
न्नुत्कृष्टश्चेलखंडधरः ॥ १२ ॥

अर्थः—घरांतून निघून मुनी राहतात अशा वनांत जाऊन गुरूजवळ व्रतें धारण करितो, तपश्चरणांत निमग्न असून भिक्षाभोजन करितो, आणि फक्त लंगोटी व अपुरतें वस्त्र ठेवितो, तो उत्कृष्ट अकरावा प्रतिमाधारी श्रावक होय.

### उपसंहार.

येन स्वयं वीतकलंकविद्या-
दृष्टिक्रियारत्नकरंडभावम् ॥
नीतस्तमायाति पतीच्छयेव
सर्वार्थसिद्धिस्त्रिषु विष्टपेषु ॥ १३ ।

अर्थः—ज्यानें स्वतःला निर्दोष ज्ञा
दर्शन, चारित्ररूपी रत्नाच्या पेटीसा
केलें त्याला त्रैलोक्यांतील पतीच्या इच्
धर्म, अर्थ, ( धन ) काम, मोक्षाची रि
प्राप्त होते.

इति श्रीसमंतभद्रविरचिते रत्नकरंड
उपासकाध्ययने एकादशप्रतिमावर्णन
सप्तमः परिच्छेदः ॥ ७ ॥

अर्थः—याप्रमाणें समंतभद्रस्वामींनी र-
चिलेल्या रत्नकरंड उपासकाध्ययनांतील अ-
करा प्रतिमावर्णन नांवाचा सातवा भाग
समाप्त झाला ॥ ७ ॥

## ॥ उपासकाध्ययन समाप्त ॥